# नेटाक्षरी

ई-साहित्य प्रकाशन

वर्ष दुसरे अंक ९ वा

१४ ज़ानेवारी २०१०

या अंकात वाचूया -




- <u>संपादक</u>
  - सोनाली घाटपांडे (पुणे)
- <u>सह संपादक</u>
  - स्वप्ना कोल्हे (नाशिक)
  - भारती सरमळकर (मुंबई)
  - सचिन काकडे (मुंबई)

# संपादकीय

मकर संक्रांती – पौष महिन्यातील महत्वाचा सण .............ह्या दिवशी सूर्याचे उत्तरायणात मार्गक्रमण सुरु होते. तसेच देवतांचा ब्राह्म मुहूर्त याच दिवशी सुरु होतो. देशभरात विविध प्रकारे ही मकर संक्राती साजरी केली जाते. या दिवशी तिळगुळासोबत दानाचेही विशेष महत्व आहे.

गुलाबी थंडी बरोबरच हलव्याचा बोचरा काटा आणि तिळगूळाचा गोडवा आणणारी अशी ही मकर संक्रांती म्हणजेच सूर्याचे मकर राशीत होणारे संक्रमण, या संक्रमणाचा महत्वाचा भाग म्हणाल तर जीवनदायी सूर्य.........स्वयं-प्रकाशित. सूर्याला धार्मिक तसेच शास्त्रीय महत्व दिले जाते.

या जगातील सर्व जिवीतांना प्रकाशीत करण्याचे, अंधःकाराचा नाश करून प्रकाशपुत्रांना मागदर्शन करणारा हा भास्कर. सूर्य, प्रभाकर, हिरण्मय, दिवाकर, आदित्य, रवी अशा अनेक नावानी ओळखल्या जाणा-या हिरण्मयीन सूर्याची उपासना करण्याचा दिवस मकर संक्रांती.

सूर्य उपासनेचे अनादी काळापासून धार्मिक महत्व सांगितले जाते, सूर्य उपासनेची विशेष फलश्रुती ही आहे. जीवनदायी सूर्याप्रमाणेच आपल्या आयुष्यातले काही क्षण आपलं आयुष्य प्रज्वलीत करुन जातात, या आणि अशा अनेक क्षणांचा साक्षीदार असणा-या याच अनादी दिव्य स्वरुपाची ओळख आपले काही कवि मित्र आपल्याला करून देणार आहेत.

"अर्घ्यदान मित्राचे तिमीरा लुटण्यासाठी
भासे सूर्यबिंब शक्तीस्त्रोत प्रकाशाचे !!
अनंत प्रकाशज्योती हृदयी सामावूनी
दिनकरा कवाळण्या हस्त प्रसारती !!
नजर मिळवता त्या सख्याशी
मिळे मज अनंतस्फूर्ती !!
मांडीला खेळ दिवस रातीचा
देण्या प्रकाशदान अनंतकरानी !!

- सोनाली घाटपांडे

## ~ ~ ~ आसमंत (when he describes himself.) ~ ~ ~

मी अनंत, दिगंत, आसमंत
मी प्रचंड, माझा कुणा कळला न पार
मी रहस्य तुम्ही अजाण क्षितीजापार
न जाणला कुणी माझा आदि ना अंत
मी अनंत, दिगंत, आसमंत

मी नश्वर घटकांचा ईश्वर
मी व्योम नक्षत्र सर्वेश्वर
मी सृष्टी निर्मितीचा एकच साक्षी
मी धरणी, सूर्य, चंद्राचा भगवंत
मी अनंत, दिगंत, आसमंत

मी छाया, माया - मृगजळ
मी पवित्र, सर्वत्र निर्मळ
मी सजीव निर्जीव सृष्टीचा निर्माता
मी  पंचप्राणातील एक प्राण जिवंत
मी अनंत, दिगंत, आसमंत

मी इंद्र, सामावूनी सर्व नक्षत्रांना
मी अलंकार धारण करतो ता-यांना
पृथ्वी केवल शोभवते मज कंठ
मी अनंत.............
मी दिगंत............
मी............. मी आसमंत !!

- **अंबरीष देशपांडे**

## ~ ~ ~ हे दिनमणी !! ~ ~ ~

नुसता तुझ्याकडे पाहून हात उंचावला
तर संपूर्ण हात प्रकाशित केलास

दिनकरा तुझ्या अभिमुख होण्याचा
केवढा हा प्रतिसाद दिलास

सत्संगतीच सुंदर चित्रण
मी अनुभवतेय, पुढे चालतेय

आयुष्याच्या वाटेवर
तुझ्या रूपातच ध्येय पहातेय

तमसो मा ज्योतिर्गमय
पुन्हा नव्याने शिकतेय

\- **प्रभा प्रभुदेसाई**

## ~ ~ ~ सूर्य म्हणजे काय हो? ~ ~ ~

सूर्य म्हणजे काय हो?
सूर्य सृष्टीची माय हो

कृपा त्याचीच सर्व जीवनावर
सजीव आणि निर्जीवांवर
कार्य त्याचे देणे जीवन
साथ देतात पर्जन्य आणि पवन

काय वर्णावी त्याची कथा
अंतराळात त्याची सत्ते पे सत्ता
कार्य त्याचे अखंड चालते
सृष्टीला नवी रोज प्रेरणा मिळते

सर्व ऋतु आहेत त्याचे गुलाम
अशा त्या राजाला माझा सलाम

**- नितीन पवार**

## ~ ~ ~ सुवर्ण प्रभा ~ ~ ~

लाल केशरात रंग खेळते पहाट खास
दिव्य तेज फाकताच जागली दिशांत आस

तारकात लोपली निशा उषेस पाठवून
अग्नीरंग होत धुंद पूर्व रेखिते नभास

सूर्यबिंब लालबुंद भेदते तमास पूर्ण
विश्वतीर पेटताच जाहला सुवर्णभास

वाहताच वात मंद, मंद मंद गंध धुंद
सांडताच पारिजात भूवरी पडेल रास

कळ्यात आळसात चिंबचिंब
का जपून पाकळीत ठेवलेय मोतियास ?

सागरात गाज आणि लाट जात उंच उंच
गारवा हवेत आणि वेड लागते मनास

पंचमात तान घेत आज कोकीळा स्वरात
स्वप्न की प्रभात काल, प्रश्न हाच लोचनास

- **प्राजक्ता पटवर्धन**

# ~ ~ ~ धुक्यात हरवलेला सुर्य ~ ~ ~



धुक्यात घेशी जन्म तरी तू सुर्यच ना रे?
दिसशी जरि निस्तेज शांत तू आगच ना रे?

अस्शी जरी तू दूर हजारो मील परंतू
तुझ्याच तुकड्या मधून जन्मले शरीर ना रे?

दिसतो मी ही शांत थंड गाळच गारठला
आतुन आहे धगधगणारा जाळच ना रे ?

तुझ्यापासून बनले बुध, शुक्र, गुरू, युरेनस
तुझ्याचपासून शुक्राणूंची पेशी ना रे?

धुक्यात कधी, कधी ढगाआड, कधी ग्रहणामागे
रात्रीचा न दिसशी, पण तू असशी ना रे ?

तुझा अंश मी, जिवंत जळता अणु मी आहे
तुझ्याच कार्यासाठी माझे अवयव ना रे ?

भणग दिसतो , परि तू दिलेली कवच कुंडले
सदैव शक्ती, भक्ती, युक्ती देती ना रे ?

काळीज धडधडण्याचे वय हे आता नाही
परंतू असते सदैव माझी  धडपड ना रे ?

धुक्यातून तू येशील आणि मी ही येईन
घडवू जो आपण तोही इतिहासच ना रे ?

अर्घ्य स्वतःच्या हस्तीचे मी देईन म्हणतो
“नाम”मात्र अस्थी मागे असतीलच ना रे ?

- **नाम गुम जायेगा**

# ~ ~ ~ जास्मिनचा रवी ~ ~ ~

नुकताच सुर्योदय झालाय
अन तो जन्माला आलाय !!

सूर्यकिरणांच्या झोतात चाललाय
धुलीकणांचा एक पिसाट नाच
त्याच्या मिटल्या डोळयांनाही जाणवणारा !

ते वैश्विक धुलीकण
उन्मुक्तपणे तरीही एका तालात फिरताना
क्षणाक्षणाला वेगवेगळे आकार धारण करतायत

प्रत्येक आकार सत्य आणि सत्यच आहे
पण तोवरच
जोवर दुसरा आकार त्याची जागा घेत नाहीये !
क्षणाक्षणाला बदलणारी सत्यांची मालिका !

पण त्याचा आत्मा मागतो आहे
फक्त एकच
आणि अंतिम सत्य !

त्याने जाणले
जणले त्याने
आणि सगळया सत्याची धूळ
एक हळूवार फुंकर मारून उडवून टाकली !

त्याच्या बालमुठी उघडल्या
आणि बोटे आपोआप ध्यानमुद्रेत गेली

डोळयात प्रशांत सागर
आणि हृदयात आनंदाचे झरे वाहणारा
तो जास्मिनचा रवी
जन्मजात बुध्द आहे

\- **अहं ब्रह्मास्मी**

## ~ ~ ~ आदित्या ! ~ ~ ~



तुझ्या रक्तीम लालीम्यातील चैतन्याचा उष्मा
माझ्या स्नेहवर्धन हृदयाची आस्थाच आहे !

तुझ्या अनंत तरल विश्वव्यापी रश्मीची स्वर्णीम काया
माझ्या तमोगुणांना छेदून जाणारी उज्वलता आहे !

तुझ्या स्पर्शाने घन कौस्तुभ धारण करणारे हिमगीरी
माझ्या नतमस्तक करबध्द श्रध्देची पवित्रताच आहे

हे पूर्णबिंबा , माझ्या कणाकणात तुझा वास आहे
माझ्या अंतस्थात देखील तुझी आस आहे

तर मग चराचरात गुंतलेल हे कसलं भय मला
जाणवत आहे ?
पूर्णत्वाचा आशिष आणि चैतन्याचा स्त्रोत मला
लाभू दे आदित्या !

नवनिर्मितीच्या सुखाचे मातृत्व मला लाभू दे आदित्या
चराचराच्या आसीम आनंदाचे मातृत्व मला लाभू दे !

- **सुरूची नाईक**



आली मकर संक्रांती
नांदी नव्या युगाची

चला राहू नका मागे
चला या रे सारे आगे
संक्रमण करु या
मकराचा सूर्य सांगे

चला झटका जुन्याला
चला कवळा नव्याला
बदलत्या जगासंगे
करा रिमिक्स सारे

चला उडवा पतंग
चला उठवा तरंग
दोर हिंमतीचा
उंच जाऊ द्या रे

चला सोडा भांडण तंटे
चला फोडा द्वेषाचे भांडे
गोड तिळगुळ घ्या
बोला बोल प्रेमाचे

घ्या
गोड तिळगुळ घ्या , बोला बोल प्रेमाचे

- स्वप्ना

नेटाक्षरी टीमतर्फे




तिळातिळाने वाढू दे प्रेम ...............

जीवनात येवो गुळाचा गोडवा ...............

मैत्रीचे सूर्यकिरण येवोत दारी ...............

सुखात साजरा होवो मकर संक्रमणाचा सोहळा ...............

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०,००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आवडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक  लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे. **netaksharee@gmail.com**